**नवीन होर्डिंग उभारणी व जाहिरात व दृक प्रसिद्धी माध्यमांद्वारे प्रसिद्धी करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मावज-२०१४/१५१/३४**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
तारीखः २ मार्च, २०१५

वाचा-

1. **शासन निर्णय क्र. सामान्य प्रशासन विभाग क्र. मावज-२०१४/प्र.क्र.१५१/३४, दिनांक १२ जानेवारी, २०१५**
2. **संचालक (प्रशासन, माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र. प्रदर्शनेका/२०१४-१५/नवीन हो.उ./का-६, दिनांक २३ फेब्रुवारी,२०१५**
3. **वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३ दिनांक ९ फेब्रुवारी, २०१५**

**शासन निर्णय-**

शासन राबवित असलेल्या कल्याणकारी योजनांची माहिती समाजातील सर्व स्तरातील जनतेपर्यत प्रभाविपणे पोहचविण्यासाठी नवीन होर्डिंग उभारणी करणे व जाहिरात व दृक प्रसिद्धी माध्यमांद्वारे माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून प्रसिद्धीसाठी रु. १६.७३ कोटी (रु. सोळा कोटी त्र्याहत्तर लाख फक्त) इतक्या रकमेची तरतूद करण्यात आलेली आहे. या तरतूदीपैकी ६०% च्या मर्यादेत रु. १०.०३८ कोटी (रुपये दहा कोटी अडतीस हजार फक्त) इतक्या रक्कमेच्या खर्चास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. आता वित्त विभागाने योजनांतर्गत बाबींसाठी ७५% च्या मर्यादेत निधी वितरणास मान्यता दिलेली असल्याने उर्वरित १५% म्हणजेच रु.२,५०,९५,०००/-(रुपये दोन कोटी पन्नास लाख पंचानऊ हजार फक्त) इतकी रक्कम खालील बाबींवर खर्च करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब |
|---|---|
| १ | नवीन होर्डिंगची उभारणी करणे |
| २ | माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाची जाहिरात फलक, वृत्तपत्रातील जाहिरात इलेक्ट्रॉनिक मिडिया, बेस्ट बस, एस.टी. बस, रेल्वे द्वारे प्रसिद्धी करणे |

उपरोक्त प्रसिद्धीच्या बाबींसाठी येणारा खर्च सामान्य प्रशासन विभाग मागणी क्र. ए-६, २२२०- माहिती व प्रसिद्धी, ६०-इतर, १०१-जाहिरात दृक प्रसिद्धी (००) (००) (०२) जाहिरात फलक लावणे (२२२०१०९५), २६ जाहिरात व प्रसिद्धी या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षातील योजनांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर खर्च करताना शासनाचे निर्णय/परिपत्रक/वित्तीय नियमावलीतील तरतूदी इ. चे पालन करावे व विहित कार्यपद्धतीचा अवलंब करण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १२७/१४४३/, दिनांक ३० एप्रिल, २०१४, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १०४२/१४/व्यय-४, दिनांक १० फेब्रुवारी,२०१४ व वित्त विभाग परिपत्रक क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ९ फेब्रुवारी, २०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०२११५६१९३१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MUSALE RAMKISAN NARAYANRAO

Digitally signed by MUSALE RAMKISAN NARAYANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVT. OF MAHARASHTRA,CID - 916891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb28cc64e4adc3dd948671d0896f641e3e54c25e6deb33a784d0a3d037ae7ff8, cn=MUSALE RAMKISAN NARAYANRAO
Date: 2015.03.02 16:53:53 +05'30'

**(रा.ना.मुसळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२) महालेखापाल (लेखापरिक्षण) (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
३) उपसंचालक (लेखा),माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई.
६) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
७) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई
८) निवड नस्ती /का.३४